**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील संगणक चालक संवर्गातील ५१ कर्मचाऱ्यांच्या नेमणूका विहीत मार्गाचा अवलंब करून झाल्याने, सदर कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी अधिसंख्य पदे निर्माण करून, सदर पदावर त्यांना कायम नियुक्ती देवून नियमित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मिभाम-११२१/सं.क्र.११७४/प्र.क्र.१००/नवि-२८**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६ जून, २०२३

वाचा : १) शासन परिपत्रक्र, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-२००५/प्र.क्र.४७/०५/१२, दि.२५.०८.२००५.

२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था/२४/२६२७/२०१३-१४, दि.१२.११.२०१३.

३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/साप्रवि/९८६/२०१५, दि.०३.०३.२०१५.

४) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मपना/आस्था/२७१/२०१८, दि.०५.०२.२०१८.

५) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपा/आस्था/१६९६/२०१७-१८, दि.०२.०५.२०१८.

६) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मिभा/मनपा/आस्था/१०३०/२०२१-२२, दि.०४.०८.२०२१.

७) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मिभा/मनपा/आस्था/१७१९/२०२२-२३, दि.०५.१२.२०२२.

८) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मिभा/मनपा/आस्था/२२२७/२०२२-२३, दि.२३.०१.२०२३.

९) मिरा-भाईंदर महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. १२९, दि.२४.११.२०२२.

**प्रस्तावना: -**

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरूपात ठोक मानधनावर 'संगणक चालक' या पदनामाचे एकूण ६३ कर्मचारी कार्यरत असून, इतर महानगरपालिकांमध्ये रोजंदारीवरील कार्यरत कर्मचाऱ्यांचे कायमस्वरूपी समावेशन करण्यात आले असल्याने, त्याच धर्तीवर मिरा-भाईंदर महानगरपालिकेमधील ठोक मानधनावर तात्पुरत्या स्वरूपातील कार्यरत असलेल्या 'संगणक चालक' पदनामाच्या कर्मचाऱ्यांना, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या नियमित आस्थापनेवर समावेशन करणेबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी विनंती केली आहे.

२. मिरा-भाईंदर महानगरपालिकेत तात्पुरत्या स्वरूपात ठोक मानधनावर कार्यरत ६३ 'संगणक चालक' कर्मचाऱ्यांपैकी ५१ **'संगणक चालक'** कर्मचाऱ्यांची नियुक्ती, महानगरपालिका महासभा ठराव क्र. २९, दि.२०.०६.२००६ व स्थायी समिती ठराव क्र. १५४, दि.२२.१२.२००६ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार वर्तमान पत्रात जाहिरात प्रसिध्द करून, विहीत पध्दतीने निवड करून, दि.२८.०२.२००७ च्या आदेशानुसार करण्यात आली होती. त्यामुळे सदर कर्मचारी महानगरपालिका सेवेत नियमित करण्यात पात्र ठरतात. तर १२ 'संगणक चालक' कर्मचाऱ्यांची नियुक्ती ही विहित प्रक्रिया (जाहिरात/लेखी परीक्षा/ मुलाखत) पार न पाडता केली असल्याने, सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक दि.२५.०८.२००५ व मा. सर्वोच्च न्यायालयाचे यासंदर्भातील

आदेश विचारात घेता सदर १२ कर्मचारी मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या सेवेत नियुक्ती देऊन नियमित करण्यास पात्र ठरत नाहीत.

**३.** मिरा-भाईंदर महानगरपालिका अंतर्गत ५१ संगणक चालकांच्या, ठोक मानधनावरील तात्पुरत्या नेमणूका ह्या विहित मार्गाचा (जाहिरात / लेखी परीक्षा / मुलाखत) अवलंब करून झालेल्या आहेत. मिरा-भाईंदर महानगरपालिकेचा आकृतीबंध दि.२६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला आहे. परंतु, आकृतीबंधात 'संगणक चालक' ही पदे मंजूर नसल्याने, महानगरपालिकेच्या आस्थापनेवर सदर कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी अधिसंख्य पदे निर्माण करणे आवश्यक आहे. सदर पदाची ७ व्या वेतन आयोगानुसार, वेतनश्रेणी S-६, १९९००-६३२०० अशी असेल. सदर कर्मचाऱ्यांची सेवा नियमित केल्यास, महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५% च्या विहीत मर्यादेत राहणार आहे. यास्तव, सदर कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करून, त्या पदांवर त्यांना नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>: -**

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील, तात्पुरत्या स्वरूपात ठोक मानधनावर कार्यरत **'संगणक चालक'** संवर्गातील ५१ कर्मचाऱ्यांच्या नेमणूका, सन २००७ मध्ये (जाहिरात/लेखी परीक्षा/मुलाखत) या विहीत मार्गाचा अवलंब करून झालेल्या असल्याने, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, या कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी अधिसंख्य पदे निर्माण करून, **'संगणक चालक,'** या पदनामाने ७ व्या वेतन आयोगानुसार, S-६, १९९००-६३२०० या वेतनश्रेणीत, त्यांची कायम नियुक्ती करून, त्यांना महानगरपालिका सेवेत नियमित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**२.** विवरणपत्र 'अ' नुसार असलेल्या सदर ५१ कर्मचाऱ्यांना, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या ५१ अधिसंख्य पदांवर पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून कायम नियुक्ती देण्यात येत आहे:-

***<u>अटी व शर्ती :-</u>***

१) या कर्मचाऱ्यांना निर्माण करण्यात आलेल्या संगणक चालक या अधिसंख्य पदांवर शासन निर्णयाच्या दिनांकापासून कायम नियुक्ती देण्यात यावी.

२) या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावरील पदस्थापनेच्या दिनांकापासून कायम सेवेचे तद्नुषंगिक लाभ (वेतन, सेवा जेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादी) देय राहतील.

३) सदर कर्मचाऱ्यांना यापूर्वी केलेल्या सेवेचे कोणतेही लाभ अथवा थकबाकी अनुज्ञेय नसेल.

४) सदर कर्मचाऱ्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करून दिला जाणार नाही.

५) सेवेत कायम करण्यापूर्वी संबंधित कर्मचाऱ्यांकडून बंधपत्र घेऊन मागील कोणताही लाभ मिळणार नाही याचा स्पष्ट उल्लेख करावा लागेल.

६) उपरोक्त ५१ संगणक चालक यांना स्थायी नेमणूक देतांना हजेरी, डिफॉल्ट रेकॉर्ड, चौकशी, सेवाजेष्ठता, जात वैधता पडताळणी प्रमाणपत्र, वैद्यकीय प्रमाणपत्र इत्यादी निकष तपासून नियमानुसार स्थायी नेमणूक देण्यात येईल. संबंधित कर्मचाऱ्यांना स्थायी करण्याच्या आदेशाच्या दिनांकापासून ०६ महिन्याच्या कालावधीत जात पडताळणी, चारित्र्य पडताळणी अहवाल सादर करणे बंधनकारक राहील.

७) मिरा-भाईंदर महानगरपालिकेत सध्या कार्यरत असलेल्या ठोक मानधनावरील ५१ संगणक चालक कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणाचीही नियुक्ती, सदर अधिसंख्य पदावर करता येणार नाही.

८) सदरचे अधिसंख्य पद कोणत्याही कारणास्तव रिक्त झाल्यास ते त्या दिनांकापासून आपोआप व्यपगत होईल.

९) सदर कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर नियुक्ती देतांना त्यांची वेतनश्रेणी शासनाने विहीत केलेल्या वेतनश्रेणीनुसार राहील, याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी दक्षता घ्यावी.

१०) सदर कर्मचाऱ्यांना एकवेळची बाब म्हणून नियुक्ती देण्यासाठी निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर अथवा इतर कारणास्तव रिक्त झाल्यास आपोआप व्यपगत होत असल्याने, त्यांच्या वारसदारांना नियुक्ती देण्यासाठी कोणतेही अधिसंख्य पद निर्माण करण्यात येणार नाही अथवा व्यपगत झालेले पद पुनर्जिवीत करता येणार नाही.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०६१६२००२३२९२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.06.16 20:07:30 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त तथा प्रशासक, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि २), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८).

**शा.नि.क्र.मिभाम-११२१/सं.क्र.११७४/प्र. क्र. १००/नवि-२८, दि. १६ जून, २०२३ सोबतचे**
**"विवरणपत्र-अ"**

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव |
|---|---|
| १ | श्रीम. सुरेखा अतुल लाड |
| २ | श्री. निर्भय जगदिश पाटील |
| ३ | श्रीम. रंजना एडवर्ड कासुघर<br>(रंजना रूपसन गऱ्या) |
| ४ | श्रीम. प्रज्ञा प्रबोध जाधव |
| ५ | श्री. आशिष अजित पांगारकर |
| ६ | श्रीम. रसिका श्रीकांत मोरे |
| ७ | श्री. अतुल चंद्रहास्य लाड |
| ८ | श्रीम. वैशाली बळवंत गायकवाड<br>(वैशाली रूपेश बनसोडे) |
| ९ | श्रीम. भाग्यश्री रामचंद्र पाटील<br>(भाग्यश्री पंकज घरत) |
| १० | श्रीम. हर्षला अनंत पाटील<br>(हर्षला कौशिक घरत) |
| ११ | श्रीम. शर्मिला शिरीष शेलार |
| १२ | श्रीम. अस्मिता भुपेंद्र जगताप |
| १३ | श्रीम. मेघा मारूती पाटील<br>(किर्ती कुणाल गुडेकर) |
| १४ | श्रीम. निष्कलंका इग्नेस बगाजी<br>(निष्कलंका गिल्बर्ट गौऱ्या) |
| १५ | श्री. कौशिक कमलाकर घरत |
| १६ | श्रीम. मनिषा नंदकुमार पाटील |
| १७ | श्रीम. मंजिरी मधुसुदन पेंडसे<br>(मंजिरी रोहन जोशी) |
| १८ | श्री. हितेश ज्ञानेश्वर भोईर |
| १९ | श्री. प्रमोद नारायण जाधव |
| २० | श्रीम. विभुती विशाल वनमाळी<br>(सौ. वैशाली भगवान कल्याणकर) |
| २१ | श्री. विरेंद्र यशवंत पाटील |
| २२ | श्रीम. लॉरेटा राफायेल गऱ्या<br>(लॉरेटा इरास्टस किणी) |
| २३ | श्रीम. माधुरी देवचंद चिटके<br>(माधुरी वसंत झेंडेकर) |
| २४ | श्री. महेश रामचंद्र पाटील |
| २५ | श्रीम. अनुष्का आनंद जोशी |

| | |
|---|---|
| २६ | श्रीम. कविता संभाजी गुरव<br>(कविता संतोष घाडी) |
| २७ | श्रीम. रेश्मा संजय म्हात्रे |
| २८ | श्रीम. सुप्रिया चंद्रकांत पाटील<br>(सुप्रिया अमर म्हात्रे) |
| २९ | श्री. अमोल जयंत पाटील |
| ३० | श्री. प्रफुल्ल अश्विन पाटील |
| ३१ | श्री. दुर्वांक पांडुरंग म्हात्रे |
| ३२ | श्री. योगेश सुभाष मोरे |
| ३३ | श्रीम. मनिषा रविंद्र कडू |
| ३४ | श्री. हितेंद्र रघुनाथ भोईर |
| ३५ | श्रीम. भक्ती राजन अरवंदेकर |
| ३६ | श्री. मंगेश प्रकाश घरत |
| ३७ | श्री. आदेश यशवंत पाटील |
| ३८ | श्री. राकेश काशिनाथ पाटील |
| ३९ | श्री. आयवन दानियेल लानगी |
| ४० | श्री. पुरूषोत्तम जगन्नाथ पाटील |
| ४१ | श्रीम. वैष्णवी जगदिश बावडेकर |
| ४२ | श्रीम. यास्मिन जाकीर शेख |
| ४३ | श्रीम. सॅन्ड्रीका जेम्स बगाजी<br>(सॅन्ड्रीका डॉसन ढोल्या) |
| ४४ | श्री. सनिल सदानंद जिकमडे |
| ४५ | श्री. मनिष गजानन भोईर |
| ४६ | श्रीम. एरिका सिरील बोर्जिस<br>(एरिका नील नुनीस) |
| ४७ | श्रीम. मिना विन्सन पोशापिर<br>(मीना प्लेचर बुरकेन) |
| ४८ | श्रीम. दिपमाला विनायक मोसेकर<br>(सायली सुनिल खेडेकर) |
| ४९ | श्रीम. सुचिता सुरेश परब<br>(सुचिता नारायण राणे) |
| ५० | श्रीम. कविता गणेश सुळे |
| ५१ | श्री. गुरूनाथ गोविंद मयेकर |

**********